**मुंबई मध्यवर्ती कारागृहातील सर्कल क्र. १२ मधील B ब्लॉकच्या तळमजल्याचा ताबा मुंबई पोलिस दलाकडे देणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एमआयएस-१३१५/प्र. क्र. ७३४/१५/तुरूंग-३

मुख्य इमारत, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ३ नोव्हेंबर, २०१५

वाचा-

१) **सह पोलिस आयुक्त (गुन्हे), मुंबई यांचे दिनांक ३०.१०.२०१५ रोजीचे पत्र**
२) **विशेष पोलिस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, मुंबई यांचे दिनांक ३०.१०.२०१५ रोजीचे पत्र**
३) **शासन अधिसूचना एमआयएस-१३१५/प्र. क्र. ७३४/१५/तुरूंग-३, दिनांक ३.११.२०१५**
४) **शासन अधिसूचना क्र. जेएलएम-१००९/प्र. क्र. ९०/पीआरएस-२, दिनांक १३.४.२००९**

प्रस्तावना-

संदर्भ-४ मधील शासन अधिसूचनेन्वये "कारागृह क्षेत्र" म्हणून घोषित करण्यात आलेला मुंबई मध्यवर्ती कारागृह येथील सर्कल क्र. १२-B ब्लॉकच्या तळमजल्याचा कारागृह क्षेत्राचा दर्जा रद्द करून महत्त्वाच्या व गोपनीय कामासाठी सदर जागेचा ताबा मुंबई पोलिस दलास देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

संदर्भ-३ मधील शासन अधिसूचनेन्वये मुंबई मध्यवर्ती कारागृह येथील सर्कल क्र. १२-B ब्लॉकच्या तळमजल्याचा कारागृह क्षेत्राचा दर्जा रद्द करण्यात आला असून सदरहू ब्लॉकच्या पहिल्या मजल्यास असलेला कारागृह क्षेत्राचा दर्जा अबाधित ठेवण्यात आला आहे.

सदरहू ब्लॉकचा तळमजला "मुंबई पोलिस दलाचे महत्त्वाचे व गोपनीय काम पूर्ण झाल्यानंतर पुन्हा मुंबई मध्यवर्ती कारागृहाच्या ताब्यात देण्यात येईल" या अटीच्या अधीन राहून रू. १/- या नाममात्र वार्षिक भाडे दराने मुंबई पोलिस दलास देण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१७१२१९५६५८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Keshav Jadiye

Digitally signed by Deepak Keshav Jadiye
DN: CN = Deepak Keshav Jadiye, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Home Department
Date: 2015.11.03 11:41:41 +05'30'

**दीपक जडीये**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. अपर पोलिस महासंचालक व कारागृह महासंचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विशेष पोलिस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, मुंबई
३. सह पोलिस आयुक्त (गुन्हे), मुंबई
४. अधीक्षक, मुंबई मध्यवर्ती कारागृह
५. गृह विभाग (तुरुंग-२), मंत्रालय, मुंबई-३२